**महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा -**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र.सीडीए-२०१०/(२८/२०१०)/लाक्षेवि(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१०

वाचा : शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.सीडीए-१००५/ (४१७/०५)/ लाक्षेवि(कामे),दि,२१.८.२००९

**प्रस्तावना :-**

सिंचन व्यवस्थापनात लाभधारकांचा सहभाग यशस्वी होण्यासाठी कार्यान्वित पाणी वापर संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्षम राहून संस्था नेहमीसाठी स्वबळावर सुदृढपणे कार्यरत राहणे आवश्यक आहे. पाणीवापर संस्थांना प्रोत्साहन देण्याकरिता पाणीवापर संस्थांच्या व्यवस्थापनामध्ये स्पर्धा निर्माण होण्यासाठी महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत दरवर्षी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा आयोजित करण्याचा शासन निर्णय दि.२१.८.२००९ अन्वये घेण्यात आलेला आहे. तसेच या पुरस्कार स्पर्धेकरीता प्रदेशस्तरीय छाननी समिती व राज्यस्तरीय छाननी समिती गठीत करण्यात आली आहे. यानुसार सहा प्रादेशिक विभागात प्रदेशस्तरावर प्रथम क्रमांक व द्वितीय क्रमांकाच्या पाणी वापर संस्थांना अनुक्रमे रुपये तीन लक्ष व रुपये दोन लक्ष आणि राज्यस्तरावर प्रथम क्रमांक,द्वितीय क्रमांक व तृतीय क्रमांकाच्या पाणी वापर संस्थांना अनुक्रमे रुपये सात लक्ष, रुपये पाच लक्ष व रुपये तीन लक्ष पुरस्कार आणि प्रशस्तीपत्र देण्यात येणार आहे. सदर पुरस्कार वितरण समारंभ दरवर्षी “ **दि.२६ फेब्रुवारी** ” रोजी (कै.शंकररावजी चव्हाण, माजी केंद्रिय गृहमंत्री व महाराष्ट्र राज्याचे माजी मुख्यमंत्री यांचा स्मृतीदिन) “**सिंचन दिनाच्या**” दिवशी आयोजित करण्यात येणार आहे.

**शासन निर्णय :**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धा राज्यस्तर व प्रादेशिकस्तरावरील पुरस्कारासाठी वर्ष २००९-१० करीता शासनाने पुढीलप्रमाणे पाणी वापर संस्थांची गुणवत्तेच्या आधारे निवड केली आहे.

## राज्यस्तरीय पुरस्कार प्राप्त पाणी वापर संस्था

**प्रथम पुरस्कार** - वाघाड प्रकल्पस्तरीय पाणी वापर संस्था, मोहाडी, ता, दिंडोरी, जिल्हा, नाशिक -वाघाड प्रकल्प

**द्वितीय पुरस्कार** - राष्ट्रसंत तुकडोजी महाराज पाणी वापर संस्था, चपराड, ता,लाखांदूर, जिल्हा, भंडारा - इटियाडोह प्रकल्प

**तृतीय पुरस्कार** - धर्मवीर संभाजी पाणी वापर सहकारी संस्था, टाकडी अंबड, ता, पैठण, जिल्हा, औरंगाबाद -जायकवाडी प्रकल्प पैठण डावा कालवा

## प्रदेशस्तरीय पुरस्कार प्राप्त पाणी वापर संस्था

| प्रदेश | पुरस्कार | पाणी वापर संस्थेचे नाव | प्रकल्पाचे नाव |
|---|---|---|---|
| **पुणे** | प्रथम क्रमांक | मेरुलिंग कालवा सहकारी पाणी वापर संस्था, ता,जावळी, जिल्हा,सातारा | धोम प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | मल्हारी मार्तंड पाणी वापर संस्था, येळपणे, ता,श्रीगोंदा, जिल्हा, अहमदनगर | कुकडी प्रकल्प |
| **नाशिक** | प्रथम क्रमांक | जय योगेश्वर पाणी वापर संस्था, ओझर, ता,निफाड, जिल्हा,नाशिक | वाघाड मध्यम प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | महात्मा फुले पाणी वापर संस्था, ओझर, ता,निफाड, जिल्हा,नाशिक | वाघाड मध्यम प्रकल्प |
| **औरंगाबाद** | प्रथम क्रमांक | नृसिंह पाणी वापर सहकारी संस्था, वांजरखेडा, ता.शिरुर अनंतपाळ, जिल्हा,लातूर | हालकी कोल्हापूर बंधारा |
| | द्वितीय क्रमांक | श्री.हनुमान शेतकरी सहकारी पाणी वापर संस्था, खुदावाडी, ता,तुळजापूर, जिल्हा, उस्मानाबाद | कुरनूर मध्यम प्रकल्प |
| **अमरावती** | प्रथम क्रमांक | कपिलेश्वर पाणी वापर संस्था, टेंभूरखेड, ता,वरुड, जिल्हा,अमरावती | शेकदरी प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | किसान पाणी वापर संस्था, बोरगांव मंजू, ता,बार्शिटाकळी, जिल्हा,अकोला | काटेपूर्णा मध्यम प्रकल्प |
| **नागपूर** | प्रथम क्रमांक | गणेश पाणी वापर संस्था, पिंपळगांव, ता,लाखांदूर, जिल्हा, भंडारा | इटियाडोह प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | श्री.गणेश पाणी वापर संस्था, कोरंभीटोला, ता, अर्जूनी (मोर) जिल्हा, गोंदिया | इटियाडोह प्रकल्प |
| **कोकण** | प्रोत्साहनपर पुरस्कार | श्रीदेवी हरदाससातेली,पाणी वापर संस्था, शिरवळ,ता,दोडामार्ग,जिल्हा,सिंधुदुर्ग | शिरवळ लघुपाटबंधारे |

पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धेंतर्गत पाणी वापर संस्थांना प्रत्येक स्तरावर वितरीत करण्यात येणाऱ्या पुरस्काराच्या रकमेचा विनियोग करण्यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना संदर्भिय शासन निर्णयात देण्यात आल्या आहेत.

१) पुरस्कार प्राप्त झालेल्या पाणी वापर संस्थेची विशेष आमसभा बोलवून त्या सभेत विनियोगाबाबत निर्णय घेण्यात यावा.

२) पाणी वापर संस्थेच्या प्रशासकीय व कार्यालयीन नवीन बाबींसाठी पुरस्कार रकमेच्या ५ टक्के पर्यंत खर्च करता येईल.

३) पाणी वापर संस्थेंच्या दृष्टीने सामुहिक उपयोगाची यंत्रसामुग्री उपकरणे (छोटे ट्रॅक्टर, मळणी यंत्र इ.) खरेदी करणेबाबत आमसभेच्या सर्वसंमतीने निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रति घनमीटर पाण्यात जास्तीतजास्त कृषी उत्पादन करणेसाठी उपाययोजना करण्याकरिताही निर्णय घेण्यात यावा.

४) पुरस्काराच्या रकमेतून कोणत्याही परिस्थितीत पाणीवापर संस्थेच्या दैनंदिन स्वरुपाचा खर्च करता येणार नाही.

५) शिल्लक राहणारी पुरस्काराची रक्कम पाणी वापर संस्थेच्या नावे राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेव, राष्ट्रीय बचत प्रमाणपत्र वगैरे मध्ये गुंतवावी. प्राप्त व्याजाच्या रकमेचा विनियोग आमसभेच्या मान्यतेने करता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२१५१४४२०००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( चं.रा.तेजाळे )
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व अप्पर मुख्यसचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त

आयुक्त, कृषी, पुणे
आयुक्त, सहकार, पुणे
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी संचालक
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता
जलसंपदा विभागातील सर्व अधिक्षक अभियंता
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी अभियंता
नियोजन विभाग, (१४३३) मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१२) मंत्रालय, मुंबई
संपर्क अधिकारी, (जलसंपदा विभाग) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
प्रत लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ